**१) यशोदा शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी संचालित कै.कस्तुरबा गांधी मूकबधीर निवासी शाळा, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर व २) जिव्हाळा अपंग मति विकास संस्था संचलीत जिव्हाळा मतिमंद मुलांची शाळा बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर ह्या मूकबधीर व मतिमंद प्रवर्गाच्या अनुदानित विशेष शाळा राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र.इडीडी २०२१/प्र.क्र.७५/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा -** १) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक अकआ/प्र-४- मति/हस्तांतर/ जिव्हाळा/सोलापूर/२ ०१५-१६/१५२७, दिनांक २४.११.२०१५.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी- /२०१७ प्र.क्र.६/अ.क.१, दि.१६.९.२०१७.

**प्रस्तावना :-**

१) यशोदा शिक्षण प्रसारक मंडळ ,बार्शी संचालित कै.कस्तुरबा गांधी मूकबधीर निवासी शाळा, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस नोंदणी प्रमाणपत्र क्र.ए-२४९, दि.०२.०३.२००९ अन्वये ५० निवासी अनुदानीत विद्यार्थी संख्येवर आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी अनुज्ञाप्ती प्रदान केलेली आहे. तसेच सदरहू नोंदणी प्रमाणपत्राचे सक्षम प्राधिकारी तथा आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी त्यांच्या दि.२६.०२.२०१९ अन्वये दि.३१.०३.२०२४ पर्यंत नूतनीकरण केलेले आहे. तसेच २) जिव्हाळा अपंग मति विकास संस्था संचलीत जिव्हाळा मतिमंद मुलांची शाळा बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस नोंदणी प्रमाणपत्र क्र.०१३३, दि.१०.१२.१९९८ अन्वये ४० अनिवासी अनुदानीत विद्यार्थी संख्येवर आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी अनुज्ञाप्ती प्रदान केलेली आहे. तसेच सदरहू नोंदणी प्रमाणपत्राचे सक्षम प्राधिकारी तथा आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे यांनी त्यांच्या दि. १२.०६.२०१८ अन्वये दि.३१.०३.२०२३ पर्यंत नूतनीकरण केलेले आहे. उक्त दोन्ही विशेष प्रवर्गाच्या शाळा ह्या सोलापूर जिल्हयातील असून राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस हस्तांतर करण्याबाबत दोन्ही पालक संस्थेमध्ये दोन्ही पदाधिका-यांची सदर हस्तांतरासाठी संमती आहे. तसेच सदरहू दोन्ही शाळा हस्तांतरामुळे दोन्ही शाळेतील कर्मचा-यांवर कोणत्याही प्रकारचा परिणाम होणार नाही, अशा प्रकारचा दोनही पालक संस्थेने ठराव केल्याचे जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी त्यांच्या दि.१५.६.२०१५ च्या अहवालात नमूद केले आहे. तसेच उक्त दोन्ही अनुदानित विशेष शाळा राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या

संस्थेस हस्तांतर करण्याबाबत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांनी आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांना विनंती केलेली आहे. शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना अपंग व्यक्ती समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग अधिनियम, १९९५ तसेच अपंग शाळा संहिता, १९९७ मध्ये शासनाने ठरवून दिलेले निकष, नियम व निर्णयाचे अनुषंगाने अत्यावश्यक सोयी सुविधा मिळण्याच्या दृष्टीने १) यशोदा शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी संचालित कै.कस्तुरबा गांधी मूकबधीर निवासी शाळा, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर व २) जिव्हाळा अपंग मति विकास संस्था संचलीत जिव्हाळा मतिमंद मुलांची शाळा बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर ह्या मूकबधीर व मतिमंद प्रवर्गाच्या अनुदानित विशेष शाळा राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता .

**शासन निर्णय :-**

१. यशोदा शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी संचालित कै.कस्तुरबा गांधी मूकबधीर निवासी शाळा, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर व २) जिव्हाळा अपंग मति विकास संस्था संचलीत जिव्हाळा मतिमंद मुलांची शाळा बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर ह्या मूकबधीर व मतिमंद प्रवर्गाच्या अनुदानित विशेष शाळा राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर या संस्थेस हस्तांतरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर संस्थेला अपंग/विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

३. सदर अपंग निवासी शाळेचे हस्तांतरणाबाबतचा सर्व खर्च संबंधीत संस्थेला करावा लागेल. त्याची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११०१३१४५९०९८०२२ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH RAMCHANDRA DINGLE

Digitally signed by DINESH RAMCHANDRA DINGLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, pseudonym=2097D404DF0287B8EA9B9CB128B351603D2AB8BA, serialNumber=FC344849650CE07C3F9ADC7E2CD4976B2852065E2ACD65F7CEE1828C10091458, cn=DINESH RAMCHANDRA DINGLE
Date: 2021.10.13 15:00:13 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मुंबई.

३) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, पुणे

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर, पुणे

६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर, पुणे

७) महालेखापाल, महाराष्ट्र- २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर, पुणे

९) अध्यक्ष, यशोदा शिक्षण प्रसारक मंडळ, बार्शी संचालित कै.कस्तुरबा गांधी मूकबधीर निवासी शाळा, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर

१०) अध्यक्ष, जिव्हाळा अपंग मति विकास संस्था संचलीत जिव्हाळा मतिमंद मुलांची शाळा बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर

११) अध्यक्ष, राजीव स्मृती बहुउद्देशीय संस्था, बार्शी, ता.बार्शी, जि.सोलापूर

१२) निवडनस्ती (दिव्यांग कल्याण-१)

*******